**राज्यातील Computerization of Forensic Labs प्रकल्पासाठी सल्लागार म्हणून नियुक्त केलेल्या मे. अर्न्स्ट अँड यंग, नवी दिल्ली या सल्लागार कंपनीस मुदतवाढ देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन निर्णय क्रमांकः एफएसएल-०४२४/प्र.क्र.२७६/पोल-४,**

२ रा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक: २३ एप्रिल २०२५.

**वाचा:**

१. मा. व तं. सं., शासन निर्णय क्र. GAD-मातंसं-०८०/४/२०१४-O/O Directorate of IT-DIT (MH), दिनांक ०५.१०.२०२३.
२. गृह विभाग, शासन निर्णय क्र.एफएसएल-०४२४/प्र.क्र.२७६/पोल-४, दिनांक १६ जुलै २०२४.
३. संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई यांचे क्र.मुं/का/१०७७१-७२/२०२४, दिनांक २९.११.२०२४ चे पत्र.
४. अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दिनांक १३.०२.२०२५ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्तासंबंधीचे पत्र दिनांक ०६ मार्च २०२५.
५. संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई यांचे क्र.मुं/का/१९९०-९१/२०२५, दिनांक २५.०२.२०२५ चे पत्र.

**प्रस्तावना:**

न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे अधिपत्याखालील मुंबई तसेच इतर प्रादेशिक व लघु प्रयोगशाळेचे संगणकीकरण करण्याच्या अनुषंगाने दि.२०.०३.२०२० रोजीच्या पत्रान्वये मे. अर्न्स्ट अँड यंग, एल.एल.पी., नवी दिल्ली या सल्लागार कंपनीची Milestone बेसवर नियुक्ती करण्यात आलेली होती. सदर कंपनीचा नियुक्तीचा कालावधी हा दिनांक २० मार्च २०२२ रोजी संपुष्टात आला होता. परंतु महाराष्ट्र राज्यातील न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळांचे संगणकीकरण हा प्रकल्प राबविण्याकरिता तसेच, प्रकल्प विस्ताराच्या अपेक्षेने, आवश्यकतेनुसार त्यांचे काम सुरु ठेवण्याकरिता प्रकल्प सल्लागार म्हणून मे. अर्न्स्ट अँड यंग, एल.एल.पी., नवी दिल्ली यांना मुदतवाढ देण्याचे विचाराधीन होते.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र राज्यातील न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळांचे संगणकीकरणासंबंधी प्रकल्प राबविण्याकरिता प्रकल्प सल्लागार म्हणून मे. अर्न्स्ट अँड यंग, एल.एल.पी., नवी दिल्ली यांना, रकाना क्रमांक ४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या दिनांकापर्यंत उद्दिष्टनिहाय व टप्पानिहाय प्रकल्प राबविण्याकरिता मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| **Sr. No.** | **Project** | **Project Name** | **Contract Extended Period** |
|---|---|---|---|
| **(1)** | **(2)** | **(3)** | **(4)** |
| 1. | 1 | Project Monitoring Unit (PMU) support computerization of Forensic Lab. | From 01st October 2024 to 31st March 2025. |
| 2. | | PMU support for post go-live phase. | from 01st April 2025 to 30th September 2025. |
| 3. | 2 | Operation and Maintenance Management for Case Tracking and Exhibit Management System. | From 01st December 2024 to 30th November 2025. |

२. सदर शासन निर्णय खालील अटींच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे:

अ. प्रकल्पांतर्गत नेमणूक करण्यात येणाऱ्या सल्लागारांना देण्यात येणारे मानधन हे Man-Month / Quarterly Milestone तत्वानुसार असेल. सल्लागाराची देयके शासनास सादर करताना सल्लागाराने महिन्याच्या / तिमाहीच्या कालावधीत केलेल्या कामाचा तपशील / अहवाल शासनास सादर करणे आवश्यक आहे.

ब. प्रकल्पांतर्गत नेमणूक करण्यात येणाऱ्या सल्लागारांना देण्यात येणारे मानधन व इतर भत्ते, माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या संदर्भ क्र.१ वरील नमूद शासन निर्णयातील तरतूदीनुसार देय राहील.

३. प्रस्तुत प्रकरणी येणारा खर्च "मागणी क्र.१, २०५५- पोलीस (००) ११५, पोलीस दलाचे आधुनिकीकरण (०१) विविध तंत्रज्ञान विकास प्रकल्प (०१) (०१) तंत्रज्ञान विकास प्रकल्प (२०५५ ए०३२), १३, कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षाखाली सन २०२५-२६ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर मुदतवाढीसंदर्भात मान्यता देण्याबाबत अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दिनांक १३.०२.२०२५ रोजीच्या बैठकीमध्ये झालेल्या निर्णयानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४२३१७२८३७९९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MADKAR PRATAP SAMPATRAO

Digitally signed by MADKAR PRATAP SAMPATRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=691ba5cde50be5ad4d70b5410e666a3f513b4fd3934f0227b3aab4ff49ee9941, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B6C9D92AA5599BE94C2F37BF0363AAF3D243DE73A6A2F15A0AE751006929371A, cn=MADKAR PRATAP SAMPATRAO
Date: 2025.04.23 17:29:33 +05'30'

**( प्रताप माडकर )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी / निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
३. महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई.
५. मे. अन्स्टं अँड यंग, एल.एल.पी., नवी दिल्ली.

**प्रत:**

निवड नस्ती, पोल-४.